राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत कार्यरत कंत्राटी कर्मचा-यांपैकी १० वर्ष व त्यापेक्षा जास्त सेवा झालेल्या कर्मचा-यांच्या सेवा समायोजनासाठी सार्वजनिक आरोग्य विभागातील मंजूर समकक्ष पदांचे सेवाप्रवेश नियम सुधारित करुन त्यामध्ये रिक्त होणा-या समकक्ष पदांवर सरळ सेवेने ७० टक्के व समावेशनाने ३० टक्के याप्रमाणे भरती करण्याबाबत सेवाप्रवेश नियमात सुधारणा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बैठक - २८२३/प्र.क्र.४३०/आरोग्य-७**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : १४ मार्च, २०२४

**वाचा :-**

१. मा.मंत्री सार्वजनिक आरोग्य विभाग यांचे अध्यक्षतेखाली दिनांक १८/०८/२०२३ व दिनांक ३१/१०/२०२३ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णय.
२. आयुक्त, आरोग्य सेवा यांचा प्रस्ताव क्र. राआसो/आस्था/समायोजन/९८८८२/२०२३, दिनांक ०७/११/२०२३.
३. दिनांक १३/०३/२०२४ रोजी झालेल्या मंत्रिमंडळाच्या निर्णयाचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियानातंर्गत कार्यरत कंत्राटी कर्मचाऱ्यांच्या सेवा समावेशनाबाबत विविध संघटनांशी मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य विभाग यांच्या अध्यक्षतेखाली दि. १८.०८.२०२३ व दि. ३१.१०.२०२३ रोजी बैठक आयोजित करण्यात आलेल्या होत्या. त्यामध्ये आरोग्य विभागामध्ये दरवर्षी रिक्त होणाऱ्या पदावर सरळसेवेने भरण्यात येणाऱ्या कोट्यापैकी सरळसेवेने ७० टक्के व उर्वरित ३० टक्के पदावर राष्ट्रीय आरोग्य अभियानातंर्गत किमान १० वर्ष व त्यापेक्षा जास्त सेवा झालेल्या कंत्राटी (तांत्रिक/अतांत्रिक) कर्मचाऱ्यांचे समायोजन करण्याकरीता वयाची अट शिथील करणे व आरोग्य विभागातील नियमित पदांकरीतांचे सेवाप्रवेश नियमांमध्ये आवश्यक ते बदल करण्याबाबत निर्णय

घेण्यात आलेला होता. त्यानुसार आयुक्त आरोग्य सेवा यांनी दि.०७.११.२०२३ च्या पत्रान्वये राष्ट्रीय आरोग्य अभियानातील कर्मचाऱ्यांच्या समायोजना संदर्भातील प्रस्ताव सादर केलेला होता. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने राष्ट्रीय आरोग्य अभियानातंर्गत कार्यरत कंत्राटी कर्मचाऱ्यांच्या समायोजना संदर्भात राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत कार्यरत असलेल्या संवर्गाच्या समकक्ष सार्वजनिक आरोग्य विभागातील मंजुर पदांच्या सेवा प्रवेश नियमामध्ये दुरुस्ती करुन ७० टक्के पदे सरळसेवेने व ३० टक्के पदे राष्ट्रीय आरोग्य अभियानांतील कंत्राटी कर्मचा-यामधून समायोजनाने भरण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत कार्यरत कंत्राटी कर्मचा-यांच्या सेवा समायोजना संदर्भात राज्य मंत्रीमंडळाच्या दिनांक १३/०३/२०२४ रोजी झालेल्या बैठकीमध्ये पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात आलेला आहे.

(१) राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत कार्यरत कंत्राटी कर्मचा-यांच्या सेवा समायोजनासाठी सार्वजनिक आरोग्य विभागातील मंजुर समकक्ष पदांचे सेवा प्रवेश नियम सुधारित करुन त्यामध्ये सरळ सेवेने ७० टक्के व दरवर्षी समावेशनाने ३० टक्के याप्रमाणे भरती करण्याबाबत सेवाप्रवेश नियमात दुरुस्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(२) राष्ट्रीय आरोग्य अभियानातंर्गत राज्यातील कार्यरत कंत्राटी कर्मचा-यांपैकी १० वर्ष व त्यापेक्षा जास्त सेवा झालेल्या कंत्राटी कर्मचा-यांचे समायोजन करण्यासाठी कर्मचा-यांच्या सेवा कालावधी एवढी वयाची अट शिथिल करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(३) राष्ट्रीय आरोग्य अभियानातंर्गत राज्यातील कार्यरत कंत्राटी कर्मचा-यांपैकी १० वर्ष व त्यापेक्षा जास्त सेवा झालेल्या कंत्राटी कर्मचा-यांचे सेवा समावेश केल्यानंतर त्यांचे वेतन त्यांना लगतच्या मागील महिन्यामध्ये प्राप्त होणा-या मानधना एवढया नियमित वेतन श्रेणीतील पुढील टप्प्यावर निश्चित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(४) केंद्र शासनाने राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत कंत्राटी कर्मचा-यांच्या शैक्षणिक अर्हतेबाबत वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या सुचना / मार्गदर्शन तत्वे यांचे काटेकोरपणे पालन करुन समायोजन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(५) राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत कार्यरत कंत्राटी कर्मचा-यांचे सेवा समायोजन मंत्रीमंडळाने घेतलेल्या निर्णयाच्या दिनांकापासुन लागू करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(६) मंत्रीमंडळाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने अंमलबजावणी करतेवेळी येणा-या तांत्रिक अडचणीबाबत विभागाच्या स्तरावरुन निर्णय घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०३. सदर शासन निर्णय मा. मंत्रीमंडळाच्या दिनांक १३/०३/२०२४ रोजी झालेल्या बैठकीच्या अनुषंगाने दिनांक १३/०३/२०२४ रोजीच्या इतिवृत्ताच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०५१४४०३९०९१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MILIND JAYANT MHAISKAR

Digitally signed by MILIND JAYANT MHAISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT, 2.5.4.20=2473caf1bd0740c3ed232022f23f47e94b26499e78b90ecc6269a55b7bd8b843, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9DC747A68267C14C9BD05A4A7749ABC36E7A3D550985715397F1DB0FAF493D82, cn=MILIND JAYANT MHAISKAR
Date: 2024.03.15 11:15:58 +05'30'

**(मिलिंद म्हैसकर)**
**अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग,**
**महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. राज्यपालांचे सचिव (५ प्रती) (पत्राने)
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव (५ प्रती), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
३. सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
५. सर्व सन्माननीय संसद सदस्य, विधानसभा व विधानपरिषद सदस्य
६. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
७. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- १, महाराष्ट्र, मुंबई.
८. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
९. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई.
१०. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा) २, महाराष्ट्र, नागपूर,
११. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,

१२ महाप्रबंधक, मा. मुंबई उच्च न्यायालय, मुंबई.
१३. प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
१४. प्रबंधक, मा. लोकायुक्त व मा. उप लोकायुक्त यांचे कार्यालय, नवीन प्रशासन भवन, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई.
१५. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१६. मा. मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई,
१७. वित्त विभाग/ व्यय- १३, मंत्रालय, मुंबई-
१८ नियोजन विभाग / कार्यासन १४७२, मंत्रालय, मुंबई.
१९.सर्व विभागीय आयुक्त
२०. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई-
२१ सर्व जिल्हाधिकारी,
२२. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२३. संचालक (आरोग्य सेवा-१), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
२४. संचालक (आरोग्य सेवा-२) आरोग्य सेवा आयुक्तालय, पुणे
२५. अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई
२६. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, माताबाल संगोपन व शालेय आरोग्य पुणे
२७. उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये
२८. सर्व जिल्हा शल्य चिकित्सक, (FWB मार्फत)
२९. सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी, (FWB मार्फत)
३०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३१. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
३२. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे
३३. सर्व कोषागार अधिकारी
३४. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती)
३५.भारती जनता पार्टी,महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरेक नं.१, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईट, मुंबई -४०००२०
३६. इंडियन नॅशनल कॉग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग दादर , मुंबई -४०००२५
३७.राष्ट्रवादी कॉग्रेस पार्टी, राष्ट्रपती भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पाईंट, मुंबई-४०००२१.
३८. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०००१
३९. बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई- ४००००१
४०. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस.व्ही. पटेल रोड, मुंबई
४१. भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पार्टी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई

४२. सह सचिव/ उपसचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी, कार्यासन सेवा-५, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

४३. सार्वजनिक आरोग्य विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई- ४००००१

४४. निवडनस्ती (कार्यासन आरोग्य-७).